विनावापर असलेल्या अनिवासी व निवासी शासकीय
<u>इमारती शासकीय वापराकरीता उपयोगात आणण्याबाबत.</u>

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्र. बीडीजी-२०१८/प्र.क्र.१९८/इमा-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०२ नोव्हेंबर, २०१८

<u>प्रस्तावना :-</u>

शासनाच्या विविध विभागांकरीता राज्यात शासकीय इमारतींचे ( कार्यालयीन व निवासी ) बांधकाम शासनाचे विविध विभाग तसेच स्थानिक स्वराज्य संस्था (जसे महानगरपालिका, नगरपालिका व इतर) विविध महामंडळ (जसे MIDC, MSEDCL व इतर ) तर्फे कार्यान्वीत करण्यात येते. परंतु, या इमारतींचा प्रत्यक्षात वापर होण्याबाबत खालील वस्तुस्थिती निदर्शनास आली आहे :-

१) बऱ्याच इमारती हस्तांतरणाच्या दृष्टीने पूर्ण होऊनही प्रत्यक्षात वापरात नाही.
२) काही इमारती अर्धवट स्थितीत दिर्घ कालावधीपासून आहेत.
३) काही इमारती पूर्ण होऊनही हस्तांतरीत न झाल्यामुळे किंवा इतर किरकोळ कारणांमुळे वापरात नाहीत.

ज्या उपभोक्ता विभागासाठी या इमारती बांधण्यात आल्या/ येतात त्या कार्यालयांकरीता अधिकारी /कर्मचारी वर्ग उपलब्ध नसणे अथवा मंजूर नसणे, तथा अपूर्ण इमारती पूर्ण करण्याकरीता निधीची मर्यादा असणे, ही कारणे हस्तांतरण न होण्यास अथवा कामे अपूर्ण असण्यास कारणीभूत असू शकतात.

अशा इमारती विना-वापर पडून न राहता वापरात आणण्यासाठी उपाययोजना करणे अनिवार्य ठरते. शिवाय, बऱ्याच विभागांना कार्यालयीन इमारतींची आवश्यकता असून (खाजगी इमारतीत, अपुऱ्या जागेत कार्यालये कार्यरत असल्यामुळे किंवा जीर्णावस्थेतील अथवा धोकादायक अवस्थेतील शासकीय इमारतीत असल्यामुळे), त्याकरीता अशा इमारती उपयोगात आणणे हा पर्याय आहे. सदर बाबतीत मा. मुख्य सचिव (महाराष्ट्र शासन) यांनी दिनांक १२.१०.२०१८ रोजी इमारतींच्या नवीन प्रकल्पांच्या मंजुरीबाबत झालेल्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीत, विभागीय आयुक्त स्तरावर सदर बाबतचा आढावा घेण्याबाबत सूचना निर्गमित करण्याचे आदेश दिलेले

आहेत. त्यानुसार अंमलबजावणी करण्याकरिता विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांना खालीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

**परिपत्रक :-**

**(१)** प्रत्येक विभागीय आयुक्त स्तरावर व जिल्हाधिकारी यांच्या जिल्हा स्तरावर, प्रत्येक जिल्हयातील (जिल्हा मुख्यालय, तालुका मुख्यालय) सर्व उपभोक्ता विभागांकडील हस्तांतरणासाठी तयार असलेल्या अथवा पूर्वी तयार झालेल्या परंतु कोणत्याही कारणास्तव उपभोक्ता विभागाने हस्तांतरीत करवून न घेतलेल्या / घेणार नसलेल्या अशा इमारतींची तसेच उपभोक्ता विभागास आवश्यकता नसलेल्या इमारतींचा वेळोवेळी आढावा घ्यावा.

**(२)** बऱ्याच कालावधीपासून अर्धवट बांधकाम झालेल्या अथवा पूर्णत्वावर असलेल्या परंतु काही कारणास्तव नजीकच्या भविष्यात पूर्ण होणे शक्य नसणाऱ्या व त्यामुळे संबंधित क्षेत्रीय उपभोक्ता विभागास आवश्यकता नसलेल्या इमारतींचा सुध्दा तपशील सदर बैठकीत प्राप्त करावा. हा तपशील मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांना **इमारत प्रकल्पांबाबत उच्चाधिकार समितीस सादर करण्याकरीता** खालील प्रपत्रात विभागीय आयुक्त कार्यालयामार्फत सार्वजनिक बांधकाम विभागास उपलब्ध करून द्यावा.

| अ. क्र. | प्रशासकीय विभागाचे नाव | वापरात नसलेल्या एकूण शासकीय इमारतींची संख्या | | | | | | विनावापराची कारणे व शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | जिल्हास्तरावरील | | | तालुकास्तरावरील | | | |
| | | जिल्हा | संख्या | इमारतीचे नाव व स्थळ | तालुका | संख्या | इमारतीचे नाव व स्थळ | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| २ | | | | | | | | |

**(३)** जिल्हयातील उपभोक्ता विभागाकडून, नव्याने आवश्यकता असलेल्या इमारतींचा प्रस्ताव शासनास प्रशासकीय मान्यता प्राप्त करण्यासाठी सादर करताना, विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांचेकडे वरीलप्रमाणे संकलित तपशीलाची दखल घेऊनच जिल्हाधिका-यांच्या प्रमाणपत्रासह असे प्रस्ताव सादर करण्याबाबत विभागीय व जिल्हा स्तराच्या उपभोक्ता विभागाच्या अधिकाऱ्यांना सूचित करण्यात यावे.

**(४)** वरीलप्रमाणे केलेल्या कार्यवाहीची प्रथम माहिती कोणत्याही परिस्थितीत दि.१५ नोव्हेंबर २०१८ पर्यंत उपलब्ध करून देण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८११०२१६४२५७२६१८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

Sachin Manikrao Chivate

Digitally signed by Sachin Manikrao Chivate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e51dff58ad80dfdae3976edee46d1bf7934d01469cb4d916976c25305666b613, serialNumber=40ae84322c80d3e4ea1b574eb3782ed6cb133b938933bdf197ed5a1551d8622a, cn=Sachin Manikrao Chivate
Date: 2018.11.02 16:49:27 +05'30'

**( सचिन चिवटे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) सर्व विभागीय आयुक्त

२) सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग

३) सर्व जिल्हाधिकारी.